नागपूर जिल्ह्यातील गोरेवाडा येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्यासंदर्भात गठीत मंत्रालयीन व क्षेत्रीयस्तरावरील सशक्तता समितीचे अधिकारांमध्ये दुरुस्तीबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.:- डब्ल्यूएलपी-०७१६/प्र.क्र.२३८/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०१७.

**वाचा :-**

शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी-१००९/प्र. क्र.११९/फ-१, दिनांक २९.११.२०११

**प्रस्तावना :-**

नागपूर जिल्ह्यातील गोरेवाडा येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्याबाबत संदर्भीय शासन निर्णय क्रमांक :-डब्ल्यूएलपी-१००९/प्र. क्र.११९/फ-१, दिनांक २९.११.२०११ जारी करण्यात आला आहे.

२. सदर प्रकल्पाचे महत्व लक्षात घेऊन शासन निर्णयातील पृष्ठ क्रमांक ४ वरील निर्णय क्र. ६ (१) व २ अन्वये मंत्रालय स्तरावरील कार्यकारी सशक्तता समिती तसेच क्षेत्रियस्तरावरील सशक्तता समिती स्थापन करण्यात आल्या आहेत व सदर समितींचे अधिकार निश्चित करण्यात आले आहेत. प्राणी संग्रहालयाच्या कामास अधिक वेग यावा ह्या दृष्टीकोनातून व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. तथा क्षेत्रियस्तरावरील सशक्तता समितीचे अध्यक्ष ह्यांना अधिकार प्रदान करणे व क्षेत्रियस्तरावरील सशक्तता समितीच्या वित्तीय अधिकारात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. तथा क्षेत्रियस्तरावरील सशक्तता समितीचे अध्यक्ष प्रकल्प व्यवस्थापन घटकाच्या कामांचा आढावा घेतील. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. तथा समितीचे अध्यक्ष ह्यांना प्रकल्पाकरिता रुपये ०२ (दोन) कोटीपर्यतच्या कामांना प्रशासकीय /तांत्रिक मान्यता देणे व निविदा मान्य करण्याचे अधिकार राहतील.

२) क्षेत्रिय स्तरावरील सशक्तता समिती प्रकल्प व्यवस्थापन घटकाच्या कामांचा आढावा घेईल. केंद्रिय प्राणीसंग्रहालय प्राधिकरण, नवी दिल्ली यांचेकडून मंजूर बृहद आराखडयातील संकल्पनामधील कामे करण्याकरीता रुपये ०५ (पाच) कोटीपर्यतच्या कामांना प्रशासकीय /तांत्रिक मान्यता देणे व निविदा मान्य करण्याचे अधिकार सदर समितीला राहतील.

३) मंत्रालय स्तरावरील कार्यकारी सशक्तता समिती व्हायाबिलीटी गॅप फंडिंग, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची नियुक्ती, अर्थसंकल्पिय तरतूद करणे व कामाच्या प्रगतीचा आढावा घेणे याबाबत नियंत्रण करेल. तसेच आंतरराष्ट्रीय बिडींगनंतर खाजगी भागीदाराची निवड

करण्याचे अधिकारही या समितीला राहतील. त्याचप्रमाणे रुपये पाच कोटीवरील जास्तीच्या कामांना मान्यता देण्याचे अधिकारही या समितीला राहतील.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६/१४७५ दि. ११.०१.२०१७ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक :- ३०/ व्यय -१० दिनांक ०३.०२.२०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१६१६५०३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2017.03.04 16:21:15 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रत-**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. व्यवस्थापकीय संचालक, एफडीसीएम लिमीटेड, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, बोरीवली, मुंबई.
१०.सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) / सर्व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव)
११.विभागीय आयुक्त, नागपूर
१२.आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
१३.अध्यक्ष, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
१४.जिल्हाधिकारी, नागपूर
१५.सह-संचालक (वित्त व कोषागारे), नागपूर
१६.मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
१७.संचालक, गोरेवाडा प्राणीसंग्रहालय, नागपूर.

१८. सह संचालक, नगर रचना, नागपूर
१९.सर्व वनसंरक्षक (वन्यजीव) / सर्व उपवनसंरक्षक (वन्यजीव)
२०.कक्ष अधिकारी (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१.कक्ष अधिकारी (विसु-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२.कक्ष अधिकारी (विसु-१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२३.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२४.फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ (निवडनस्ती).